राजीव गांधी मिलिटरी स्कूल व उच्च माध्यमिक विद्यालय, कोलवड जि. बुलढाणा या सैनिकी शाळेतील उच्च माध्यमिक शिक्षकांच्या ५.५ पदांना मान्यता मिळणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: इसैशा-२०१९/प्र.क्र.७८/एसएम-६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ३२
दिनांक: ०९ मे, २०२५.

वाचा -

१) शासन निर्णय,शालेय शिक्षण विभाग,क्रमांक इसैशा १९९५/प्र. क्र.२७८/माशि-८ दि.२६सप्टेंबर,१९९५
२) शासन निर्णय,शालेय शिक्षण विभाग,क्रमांक इसैशा २००१/प्र. क्र.१८५/माशि-७ दि.५जुलै, २००२
३) शासन निर्णय,शालेय शिक्षण विभाग,क्रमांक इसैशा २००६/प्र.क्र.१२३/माशि-७ दि.२४ डिसेंबर, २००७
४) शासन निर्णय,शालेय शिक्षण विभाग,क्रमांक इसैशा २०१९/प्र.क्र.७८/एसएम-६ दि.१३ सप्टेंबर, २०१९

प्रस्तावना-

राज्यात खाजगी व सक्षम स्वयंसेवी संस्थांना माध्यमिक स्तरावर सैनिकी शिक्षण देणा-या शाळा सुरु करण्यास संदर्भीय क्र. (१) येथील दिनांक २६ सप्टेंबर, १९९५ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. सन १९९६-९७ पासून शासनाने मान्यता दिलेल्या ज्या सैनिकी शाळेमध्ये इयत्ता १० वी पर्यंतचे वर्ग आहेत तेथे इयत्ता ११ वी व नैसर्गिक वाढीने इयत्ता १२ वी चा शास्त्र (विज्ञान) शाखा अभ्यासक्रम सुरु करण्यास संदर्भीय क्र. (२) येथील दिनांक ५ जुलै, २००२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. या सैनिकी शाळांमध्ये आदिवासी विद्यार्थ्यांना शिक्षण देण्यासाठी सैनिकी शाळांतील सर्वसाधारण तुकडीस जोडून जादा तुकडी सन २००८-०९ पासून सुरु करण्यास संदर्भीय क्र. (३) येथील दिनांक २४ डिसेंबर २००७ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे.

२. तात्यासाहेब कोरे मिलीटरी ॲकॅडमी, वारणानगर, जि. कोल्हापूर या संस्थेकडून हस्तांतर (संस्थेला नको असलेली) झालेली अतिरिक्त आदिवासी तुकडी राजीव गांधी मिलीटरी स्कूल व उच्च माध्यमिक विद्यालय, कोलवड, बुलडाणा या शाळेस सन २००८-०९ पासून सुरु करण्यास दिनांक ०९.०६.२००९ च्या पत्रान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शाळेस आदिवासी विद्यार्थ्यांसाठी सन २०१९-२० पासून इयत्ता ११ वी शास्त्र (विज्ञान) ची एक तुकडी व सन २०२०-२१ पासून नैसर्गिक वाढीने इयत्ता १२ वी शास्त्र (विज्ञान) ची एक तुकडी सुरु करण्यास संदर्भीय क्र. (४) येथील दिनांक १३ सप्टेंबर २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. आता दिनांक ९ जुलै २०२४ रोजी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील बैठकीत उच्चस्तरीय सचिव समितीने मान्यता देण्यात आलेल्या इयत्ता ११ वी व इयत्ता १२ वी अतिरिक्त आदिवासी तुकडीवरील ५.५ शिक्षकीय पदांना ( ५पूर्णवेळ व १ अर्धवेळ) पदांना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

दिनांक ९ जुलै २०२४ रोजी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील बैठकीत उच्चस्तरीय सचिव समितीने दिलेली मान्यता लक्षात घेऊन राजीव गांधी मिलिटरी स्कूल व उच्च माध्यमिक विद्यालय, कोलवड जि. बुलढाणा या सैनिकी शाळेतील इयत्ता ११ वी एक तुकडी व इयत्ता १२ वी ची एक याप्रमाणे एकूण २ अतिरिक्त आदिवासी तुकडीकरिता ५.५ शिक्षकीय ( ५ पूर्णवेळ व १ अर्धवेळ) पदांना मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | शाळेचे नाव | मान्य करण्यात आलेली तुकडी संख्या | | मंजूर पद संख्या |
|---|---|---|---|---|
| | | ११ वी ची तुकडी | १२ वी ची तुकडी | |
| १ | राजीव गांधी मिलिटरी स्कूल व उच्च माध्यमिक विद्यालय, कोलवड जि. बुलढाणा | १ | १ | ५.५ पदे |

२. सदर सैनिकी शाळेस उपरोक्त प्रमाणे अतिरिक्त आदिवासी तुकडीवरील ५.५ पदांना खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे :-

१) सन २०१९-२० या वर्षापासून सदर तुकडी सुरु असल्याने या विनाअनुदानित तुकडीवर कार्यरत असलेल्या शिक्षकांना नियमानुसार पात्र असल्यास प्राधान्य देण्यात यावे.

२) विभागाच्या दिनांक १३ ऑक्टोबर २००० रोजीच्या शासन निर्णयानुसार राज्यातील माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळामंध्ये सुधारीत शिक्षणसेवक योजनेनुसार शिक्षक भरतीनंतर सुरवातीची ३ वर्षे मानधन तत्त्वावर शिक्षक सेवक व तद्नंतर नियमित वेतनश्रेणीवर घेण्यात येईल, असे नमुद आहे.त्यानुसार कार्यवाही करावी.

३) आदिवासी विकास विभाग सदर तुकड्यांवरील खर्च भागविणार आहे. सदर खर्च आदिवासी विकास विभागास उपलब्ध करून दिलेल्या "कार्यक्रम" यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. या बाबीकरीता वित्त विभागामार्फत अनिवार्य बाबीमधून निधी उपलब्ध करून दिला जाणार नाही

४) सदर पदभरती प्रचलित नियमांनुसार विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करून करण्यात यावी. ही बाब संबंधित संस्थेला विभागीय शिक्षण उपसंचालक,अमरावती विभाग, अमरावती यांनी सकारण कळवावी.

५) सदर पदभरती विहित शैक्षणिक अर्हता तपासून करावी.

६) शिक्षक पदभरती करतांना आरक्षण विषयक नियमांचे व धोरणांचे काटेकोरपणे पालन करावे. याबाबतची जबाबदारी संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग. अमरावती यांची राहील.

३. सदर पदांसाठी येणा-या वित्तीय भाराच्या अनुषंगाने आदिवासी विकास विभागाने आवश्यक कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४३५/व्यय-५, दिनांक०२/०४/२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५०९१३२९४६०१०६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MOHAN GANGADHAR ARSEWAD

Digitally signed by MOHAN GANGADHAR ARSEWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Scl Edu Sports Dept, 2.5.4.20=027E8A184CB92402C6C6139E412125248AC1ECE7F68904E45DC14093B5D8D7CB, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B1C23F6708AA765FAC959A80F61E842220AF28805D73BEB4D6724F18ED7C9C38, cn=MOHAN GANGADHAR ARSEWAD
Date: 2025.05.09 13:31:35 +05'30'

**( मोहन गं. आरसेवाड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
२. मा उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री(नवी)(वित्त) यांचे खाजगी सचिव, मत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्य मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, मुंबई
७. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद, मुंबई
८. सर्व विधान सभा व विधान परिषद सदस्य
९. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण) मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१०. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
११. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. अवर सचिव (व्यय-५) वित्त विभाग मंत्रालय, मुंबई
१३. विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती.
१४. शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, बुलढाणा
१५. निवड नस्ती (एसएम-६).